**खासदार स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रमाचे संनियंत्रण करण्यासाठी स्वतंत्र कक्ष निर्माण करणे व त्यासाठी पदे निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः निविआ-१७१५/प्र. क्र.४८१/१४२१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ९ नोव्हेंबर, २०१५

**प्रस्तावना :**

स्थानिक गरजेनुसार माननीय खासदारांना त्यांच्या मतदारसंघात लोकोपयोगी मालमत्ता निर्माण करण्यासाठी खासदार स्थानिक क्षेत्र विकास योजना राबविण्यात येत असून या योजनांतर्गत केंद्र शासनाकडून निधी उपलब्ध करण्यात येतो. सदर निधीमध्ये वेळोवेळी वाढ करण्यात आली आहे. वाढीव निधीमूळे कामांच्या संख्येतही वाढ झाली आहे. या योजनेची प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रण होण्यासाठी एक स्वतंत्र कक्ष राज्य स्तरावर निर्माण करण्याची शिफारस केन्द्र शासनाच्या सांख्यिकी व कार्यक्रम अंमलबजावणी मंत्रालयाने केली आहे. त्यानुसार खासदार स्थानिक क्षेत्र विकास योजनेच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणासाठी राज्य स्तरावर एक स्वतंत्र नवीन कक्ष व त्यासाठी आवश्यक पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

खासदार स्थानिक क्षेत्र विकास योजनेच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रण करण्याच्या दृष्टीने राज्यस्तरावर एक वेगळा व स्वतंत्र कक्ष निर्माण करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येते आहे. या कक्षामध्ये खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे चार पदे नियोजन विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवर तात्पुरत्या स्वरुपात निर्माण करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रु.) | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | सह संचालक (अर्थ व सांख्यिकी संचालनालय संवर्गातील) / अवर सचिव (मंत्रालय संवर्गातील) | १५६००-३९१०० + ग्रेड पे ६,६००/ - | १ |
| २ | संशोधन सहायक (अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या संवर्गातील) | ९३००-३४८०० +ग्रेड पे ४३००/- | १ |
| ३ | सांख्यिकी सहायक (अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या संवर्गातील) | ५२००-२०२०० +ग्रेड पे २८००/- | २ |
| | एकूण | | ०४ |

२. या संनियंत्रण कक्षासाठी, वरील तक्त्यात नमूद केलेल्या पदांव्यतिरिक्त सहायकाचे एक पद असेल. हे पद बाह्य यंत्रणेद्वारे भरण्यात येईल.

३. उपरोक्त पदापैकी सह संचालक / अवर सचिव हे पद या दोन्ही संवर्गापैकी कोणत्याही एका संवर्गातून भरण्यात यावे.

४. नव्याने निर्माण केलेल्या उपरोक्त चार पदांचा नियोजन (खुद्द) विभागाच्या आस्थापनेवरील मंजूर आकृतीबंधात समावेश करण्यात येईल.

५. सदर पदे प्रथमत: दिनांक २८ फेब्रुवारी, २०१६ पर्यंत चालू राहतील.

६. या पदांच्या वेतन व भत्त्यावरील खर्च मागणी क्रमांक ओ-७, ३४५१-सेक्रेटरिएट आर्थिक सेवा, ०९०-सेक्रेटरिएट, (०१) (०१) नियोजन विभाग, योजनेतर (३४५१०१८२), ०१ वेतन या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

७. या प्रयोजनाकरिता उप सचिव (आस्थापना) यांना नियंत्रक अधिकारी व कक्ष अधिकारी कार्या. १४२२ (रोखशाखा) यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

८. वित्त विभागाने त्यांच्या औनपचारिक संदर्भ क्रमांक २४९/१२/व्यय-८, दिनांक ३.०८.२०१२, रोजी दिलेल्या सहमतीनुसार व उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक १८ जून, २०१४ रोजी झालेल्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०९१५५३२९२९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anuradha Ravindra Patil

Digitally signed by Anuradha Ravindra Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fea20e6e0ac5b86a2906ff97cc77420b17b511871758edb916644dbb0cc479c1, serialNumber=e7e1f96dff00df5a611f665a9a87611bd8b56d4a403d61fb9d7beabca923b428, cn=Anuradha Ravindra Patil
Date: 2015.11.09 15:57:08 +05'30'

**अ. र. पाटील**
उप सचिव, नियोजन विभाग

**प्रत,**

१) महालेखापाल (ले. व अ. व ले. प.), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३) सर्व सह / उप / अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) सह / उप सचिव, (कार्या. व्यय-८ व वि. सु. १), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सह /उप सचिव, (कार्या. १२. व १४), सामान्य प्रशासन विभाग मंत्रालय, मुंबई .
८) निवडनस्ती कार्या. १४२१.